जल जीवन मिशन अंतर्गत आदिवासी घटक (राज्य हिस्सा) खाली प्राप्त निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ ए०६१)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजीमी-२०२३/प्र.क्र.३३०/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: २१ ऑगस्ट,२०२३

**वाचा-**

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.जजमि -२०१९/प्र.क्र.१३८/पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.जजीमि २०२३/प्र.क्र.२९/पापु १०, दि.०९.०५.२०२३
३. संचालक, राष्ट्रीय जल जीवन मिशन, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.G-11011/2/2023-JJM-I-DDWS, दि. ०४.०५.२०२३
४. अवर सचिव, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र. W-११०२०/१९७/२०१५-Water-I/१३, दि. १८.०७.२०२३

**प्रस्तावना-**

राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना संदर्भाधिन क्र. १ अन्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन अंतर्गत केंद्र व राज्य वित्तीय आकृतीबंध १:१ आहे. जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षाकरीता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत (राज्य हिस्सा) लेखाशीर्ष २२१५ ए०६१ अंतर्गत ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.३००.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी रूपये ३९.०१२९ कोटी इतका निधी संदर्भाधिन क्र.२ अन्वये अर्थसंकल्प अंदाज, वितरण व सनियंत्रण प्रणालीवर राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करण्यात आला आहे.

जल जीवन मिशन अंतर्गत राज्याकरीता सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षाकरीता एकूण रू. २१४६५.८८ कोटी (केंद्र हिस्सा) इतके नियतव्ययाची तरतूद केले असल्याबाबत संदर्भाधिन क्र. ३ अन्वये कळविले आहे. त्यापैकी केंद्र शासनाने संदर्भाधिन क्र.४ अन्वये सन २०२३-२०२४ वित्तीय वर्षातील प्रथम हप्ता रू. ३७२२.१३ कोटी मधील प्रथम भाग (First Tranche of First Installment) म्हणून रु.१८६१.०६५ कोटी इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला ESCROW खात्यात उपलब्ध करुन दिला आहे. त्यामध्ये आदिवासी घटक कार्यक्रमाखालील रू. १८३.३१२५ कोटीचा समावेश आहे.

जल जीवन मिशन अंतर्गत आदिवासी घटक कार्यक्रमाखाली केंद्र हिस्सा रू. १८३.३१२५ निधीस समरुप राज्य हिश्श्याकरीता रु. १८३.३१२५ कोटी इतका निधी उपलब्ध करुन आवश्यक आहे. त्यामुळे जल जीवन मिशन अंतर्गत आदिवासी घटक कार्यक्रम राज्य हिश्श्याखाली रु. १८३.३१२५ कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२३- २०२४ या आर्थिक वर्षामध्ये आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत (राज्य हिस्सा) "मागणी क्र. टी-०५, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१), जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१०) जल जीवन मिशन (राज्य हिस्सा ५० टक्के)(कार्यक्रम) (२२१५ ए०६१)" या लेखाशीर्षांतर्गत ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली रु. १८३.३१२५ कोटी (अक्षरी-रु. एकशे त्र्याऐंशी कोटी एकतीस लक्ष पंचवीस हजार फक्त) इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खात्यामध्ये वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code-HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक ९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code-HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

३. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि. १२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२१११२७३२५३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD SWAMI

Digitally signed by PRASAD SWAMI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=aaf002dc55f52d8292cd1b600e0a80b7cf51b57c6f840c909c76407640c157f4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D84D41A9008354A0AF034B551119753B7D1C967B179AC7110EAA1867A160049, cn=PRASAD SWAMI
Date: 2023.08.21 18:47:34 +05'30'

(प्रसाद स्वामी)
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. उपसचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

२. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, वरीलप्रमाणे निधी तातडीने एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन पापु १०